**जनजाती क्षेत्र उपयोजना/जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना**
**जून,२००९ अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पात समाविष्ट करण्यात आलेल्या "महिला व बाल विकास" उपशिर्षाखालील योजनांतर्गत तरतूदीचे वाटप.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.बीयुडी-२००९/प्र.क्र.१०/का.६**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- १७ नोव्हेंबर,२००९**

**वाचा :** वित्त विभागाचे परिपत्रक क्र,पूरक - १०.०९/प्र.क्र.१५२/अर्थसंकल्प-३, दि.३० जून, २००९

**शासन निर्णय :-** आदिवासी उपयोजनेंतर्गत सन २००९-१० या चालू आर्थिक वर्षाच्या उर्वरित कालावधीसाठी सोबतच्या विवरणपत्रातील स्तंभ-२ मध्ये दर्शविलेल्या योजनांच्या तरतूदी स्तंभ-३ मध्ये दर्शविलेल्या नियंत्रक अधिकाऱ्यांकडे सुर्पूद करण्यात येत असून सदर तरतूद खर्च करण्यास मंजूरी देत आहे. त्यांनी या तरतूदी कॅश फ्लो प्रमाणे खर्च कराव्यात.

२. अंमलबजावणी अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व क्षेत्राबाहेरील मान्य कार्यक्रमांवर/योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी. सदर तरतूदी संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहेत.

३. अंमलबजावणी अधिकारी व विभाग प्रमुख यांनी मुख्य आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला मुख्य आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल व तो केंद्रशासनाला कळविता येईल.

४. सर्व अंमलबजावणी अधिका-यांनी योजनावार मासिक खर्चाची विवरणे मुख्य आदिवासी क्षेत्र व अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रासाठी व आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी स्वतंत्रपणे विहीत प्रपत्रात ज्या महिन्यात खर्च झाला असेल त्याच्या पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत या विभागास, नियोजन विभाग, वित्त विभाग व इतर संबंधित प्रशासकीय विभाग व आदिवासी विकास, आयुक्त यांचे कार्यालय, नाशिक यांना पाठवाव्यात.

५. अंमलबजावणी अधिकारी/विभाग प्रमुख यांनी नियम प्रचलित कार्यपध्दती व सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन चालू योजनांवर खर्च करावा. हे आदेश फक्त अंमलबजावणी /नियंत्रक अधिका-यांच्या अधिनस्त ठेवलेल्या तरतुदीस प्रशासकीय दृष्टया मान्य केलेल्या चालू योजनांवर खर्च करण्यासाठी आहे. याची अंमलबजावणी अधिका-यांनी नोंद घ्यावी.

**६. आदिवासी उपयोजनेअंतर्गत जनजाती क्षेत्र उपयोजना (टिएसपी) व जनजाती क्षेत्र उपयोजना (ओटिएसपी) यांचा खर्च स्वतंत्रपणे नोंदविण्यासाठी लेखाशिर्षामध्ये काही बदल करण्यात आले असल्यास हे बदल लक्षात घेवून खर्च नोंदविताना सुधारित लेखाशिर्ष नोंदविण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.**

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक **२००९१११७१७३०६३००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

श. र. सावंत
१७/११/०९

**( श. र. सावंत )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
आयुक्त, महिला व बाल विकास, मुंबई.
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, कोकण भवन, नवी मुंबई.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर
**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (सर्व)**
महालेखापाल (लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर (प्रत्येकी ३ प्रती)
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
महिला व बालविकास विभाग (बजेट), मंत्रालय, मुंबई-३२
**सर्व अधिकारी / कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.**
निवड नस्ती (का.६),

**जनजाती क्षेत्र उपयोजनेखालील जून,२००९ च्या अधिवेशनात मंजूर झालेल्या पूरक तरतूदीचे जिल्हानिहाय वाटप**

**<u>पूरक मागणी बाब क्र.३१२</u>**

| | |
|---|---|
| **शिर्ष :-** महिला व बाल विकास<br>**योजनेचे नाव :-** अतिरिक्त अंगणवाडया सुरु करणे.<br><br>**(राज्यस्तरीय योजना)**<br><br>**(रुपये हजारात )** | **मागणी क्रमांक :-** टी-५<br>**मुख्य लेखाशिर्ष :- २२३६**-पोषण आहार-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०२-पोषक अन्न व व पेये वितरण- ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १२३ व २६१ अन्वये जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने<br>**(२२३६ ०२९७)** ३१ सहाय्यक अनुदाने |

| **जिल्हयाचे नाव** | **२००९-१० साठी केलेली तरतुद** | **२००९-१० ची पूरक तरतुद सुपुर्द करण्यात आलेला नियंत्रण अधिकारी** | **प्रशासकीय विभाग** | **शेरा** |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| | १२०००० | सचिव<br>महिला व बाल विकास विभाग,<br>मंत्रालय, मुंबई | महिला व बालविकास विभाग,<br>मंत्रालय, मुंबई | |
| **एकूण** | **१२००००** | | | |